**मा. मंत्री (रोहयो) यांचेसाठी नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहन २०१६/ प्र.क्र.१६३/मग्रारो-३**
नवीन प्रशासकीय भवन, १६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २४ नोव्हेंबर, २०१६.

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ९.७.२०१६ च्या अधिसूचनेन्वये नवनियुक्त मंत्री यांना विभागाचे कामकाज नेमून देण्यात आले आहेत. त्यामध्ये रोजगार हमी योजना प्रभागासाठी स्वतंत्र मंत्री नियुक्त करण्यात आले आहेत. रोजगार हमी योजना विभागात यापूर्वी स्वतंत्र प्रभारी मंत्री नसल्याने, त्यांचेसाठी कोणतेही वाहन अनुज्ञेय करण्यात आलेले नाही. नवनियुक्त मा. मंत्री (रोहयो) यांना शासकीय दौ-यांच्या निमित्त प्रवास करण्यासाठी नवीन शासकीय वाहनाची आवश्यकता आहे. यास्तव वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र:वाहन - २०१४/प्र.क्र.९/२०१४, दिनांक ८.५.२०१४ अन्वये शासकीय वाहनांची ठरवून देण्यात आलेल्या किंमत मर्यादा धोरणानुसार मा. मंत्री (रोहयो) यांचेसाठी वाहन खरेदी करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

नवनियुक्त मा. मंत्री (रोहयो) यांना शासकीय दौरे/प्रवास यासाठी Toyota Innova Crysta, २.४.Z, Bucket seats (Manual) हे वाहन, वाहन उत्पादक कंपनीने सुचविलेल्या अधिकृत पुरवठादाराकडून "एकलस्त्रोत" पद्धतीने खरेदी करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर वाहन खरेही करण्यासाठी येणा-या रु. १९,९७,२२२/- (एकूण रुपये एकोणीस लक्ष सत्त्याण्णव हजार दोनशे बावीस फक्त) (व्हॅटसह) एवढया खर्चास या शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| Sr. No | Authorised showroom | M/s Shinrai Toyota, Nariman Point, Mumbai | |
|---|---|---|---|
| | **Model No** | **Rate (single unit)** | **Amount in Rs.** |
| 1. | Toyota Innova Crysta 2.4. Z Bucket seat (Manual) (White Colour) | **Base Price (Inclusive of VAT)** | 19,65,814.00 |
| 2 | | 1% TCS | 19,658.00 |
| 3 | | Registration charges (Road Tax + IMV +HYP + Service charges) | Self |
| 4 | | Insurance | self |
| 5 | | Depot Charges | 10,000.00 |
| 6. | | CRTM Charges | 1,750.00 |
| **Total** | | | **19,97,222.00** |

२. उपरोक्त वाहनांच्या खरेदीसाठी होणारा खर्च भागवण्यासाठी संक्षिप्त देयकाद्वारे आहरित करण्यास वित्त विभाग (विनियम कार्यासन) यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५४१/विनिमय, दिनांक १९.११.२०१६ अन्वये पुढील अटींच्या अधिन राहून मान्यता दिली आहे

१ मा. मंत्री (रोहयो) यांना कोणतेही वाहन अनुज्ञेय करण्यात आलेले नाही व यापूर्वी रोजगार हमी योजना विभागास स्वतंत्र मंत्री नव्हते हे विचारात घेता व सदरचा प्रस्ताव विभागाकडून प्रथमच सादर करण्यात आल्याने तो मंजूर करण्यात येत आहे.

२ मात्र राज्य स्तरीय वाहन आढावा समितीच्या पुढील बैठकीत प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी घेण्यात यावी.

३. वित्त विभागाच्या उपरोक्त मान्यतेनुसार वाहन खरेदीसाठी येणा-या खर्चाचे देयक संक्षिप्त देयकावर काढण्यास याद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

४. मे. शिनराई टोयोटा, नरीमन पॉईंट, मुंबई यांनी TOYOTA CRYSTA २.४.Z Bucket seat (पांढरा रंग) या बनावटीच्या १ वाहनांचा पुरवठा तात्काळ नियोजन विभाग (रोहयो), मुंबई यांना करावा.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक ओ-३, मुख्य लेखाशीर्ष २५०५-ग्रामीण रोजगार-६०-इतर कार्यक्रम-००१ रोजगार हमी योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०१)(०१) रोजगार हमी योजना (२५०५ ००२२) (खर्चाचे उद्दिष्ट संकेतांक ५१-मोटर वाहने)" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे आदेश वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ३५६/व्यय-८, दिनांक १८.११.२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार तसेच वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र. १९-ब, नियम क्र. ६९ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तिय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२३१७२३०३९८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Ramesh Pimpale

Digitally signed by Prashant Ramesh Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prashant Ramesh Pimpale
Date: 2016.11.24 15:29:52 +05'30'

**(प्रशांत र. पिंपळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रती,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (२ प्रती) (रोख शाखेमार्फत).

प्रत :-

१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

२. अवर सचिव (रोख शाखा) यांना विनंती करण्यात येते की, रु. १९,९७,२२२/- (एकूण रुपये एकोणीस लक्ष सत्त्याण्णव हजार दोनशे बावीस फक्त) इतक्या रक्कमेच्या धनादेश आहरण व संवितरण अधिकारी यांच्या नांवे काढण्यात यावा.

३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १, मुंबई.

४. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई.

५. मे. शिनराई टोयोटा, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१.

६. कक्ष अधिकारी, व्यय-८/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

७. सहाय्यक संचालक (लेखा), मग्रारो-७, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

८. निवडनस्ती, कार्यासन (मग्रारो-३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.